सन २०२३-२४ मध्ये राष्ट्रीय खादय तेल अभियान करिता वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राखातेअ-२०२३/प्र.क्र.६७/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २७ जून, २०२३

संदर्भ:-

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९/०४/२०१७
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे, दि.०४/११/२०२०
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. साविव्य-२०२१/प्र.क्र. ४२/२-अे, दि.०२/०८/२०२१
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-१/२०२३/NFSM-OILSEEDS, दि.०९ मार्च, २०२३
५. केंद्र शासनाचे पत्र क्र. १३-१७/२०२३-PC, दि.१४ एप्रिल, २०२३
६. कृषि आयुक्तालयाचे पत्र Extn.२/NMEO/AAP२०२३-२३/F.NO.१/१५७०१, दि.१० मे, २०२३
७. शासन पत्र क्र.RKY-०१२३/C.R.१३/१४-A, दि.३० मे, २०२३
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र२/राखातेअ/वाकृआ/प्रमाप्र/प्र.क्र.०१/१९५३५/२३, दि.०९ जून, २०२३
९. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र२/राखातेअ/वाकृआ/प्रमाप्र/प्रक्र०१/२०८२९/२३, दि.२१ जून, २०२३

**प्रस्तावना:**

सन २०२२-२३ पासून केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (गळीतधान्य व तेलताड) चे रुपांतर राष्ट्रीय खादय तेल अभियान (National Mission on Edible Oil-NMEO) मध्ये केले आहे. केंद्र शासनाने राष्ट्रीय खादय तेल अभियान करिता सन २०२२-२३ चे प्रलंबित दायित्व हे वार्षिक कृति आराखड्यात अंतर्भूत करुन सन २०२३ -२४ करीता अभियाननिहाय रु. ४२५०.०० लाखाचा केंद्र हिश्याचा नियतव्यय संदर्भाकिंत दि. ०९ मार्च, २०२३ च्या पत्रान्वये कळवून वार्षिक कृति आराखडे प्रस्तावित करण्याबाबत सूचित केले होते. तसेच, केंद्र शासनाच्या संदर्भाकिंत दि. १४ एप्रिल, २०२३ च्या इतिवृत्तात मंजूर तरतुदीच्या १२५ %मर्यादेत वार्षिक कृती आराखडा राज्य स्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) मान्यतेस सादर करणेबाबत नमूद केले होते. राष्ट्रीय खादय तेल अभियान करिता रु. ८६६९.५६ लाखाचे वार्षिक कृति आराखडा कृषि आयुक्तालयाच्या नियोजन शाखेमार्फत राज्य स्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) मान्यतेस सादर करण्यात आला होता. तसेच सदर वार्षिक कृति आराखडा कृषि आयुक्तालयाने संदर्भाकिंत दि.१० मे, २०२३ च्या पत्रान्वये केंद्र शासनास सादर केला होता.

त्यानुषंगाने कृषि आयुक्तालयाने संदर्भाकिंत दि.०९ व २१ जून, २०२३ च्या पत्रांन्वये सादर केलेल्या राष्ट्रीय खादयतेल अभियानाच्या सन २०२३-२४ साठीच्या वार्षिक कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०२३-२४ करिता राष्ट्रीय खादयतेल अभियान अंतर्गत एकूण ₹ ८६६९.५६ लाख (रुपये शहाऐंशी कोटी एकोणसत्तर लाख छपन्न हजार) निधीच्या वार्षिक कृती आराखडयास पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाख)

| अ. क्र. | उपअभियान | मंजूर नियतव्यय (केंद्र हिस्सा) | सन २०२३-२४ साठी प्रस्तावीत कार्यक्रम | | | प्रलंबित दायित्व | | | प्रलंबित दायित्वासह वार्षिक कृती आराखडा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | एकूण | केंद्र | राज्य | एकूण | केंद्र | राज्य | एकूण |
| १ | तेलबिया (Oilseeds) | ४०५०.०० | ४७६१.१२ | ३१७४.०८ | ७९३५.२१ | ३०१.३८ | २००.९२ | ५०२.२९ | ५०६२.५ | ३३७५.०० | ८४३७.५० |
| २ | वृक्षजन्य तेलबिया (Tree Born Oilseeds) | १००.०० | ३०.०४ | २०.०२ | ५०.०६ | ९.२१ | ६.१४ | १५.३५ | ३९.२४ | २६.१६ | ६५.४० |
| ३ | भात पड क्षेत्रामध्ये तेलबिया उत्पादन वाढ (Targeting Rice Fallow Area) | १००.०० | ९६.७७ | ६४.५१ | १६१.२८ | ३.२३ | २.१५ | ५.३८ | १००.०० | ६६.६६ | १६६.६६ |
| | **एकूण एकंदर** | **४२५०.००** | **४८८७.९३** | **३२५८.६१** | **८१४६.५५** | **३१३.८२** | **२०९.२१** | **५२३.०२** | **५२०१.७४** | **३४६७.८२** | **८६६९.५६** |

२. केंद्र शासनाच्या Re-Vamped Guidelines मध्ये (अनुसूचित जातीसाठी १६.६० टक्के, अनुसूचित जमातीसाठी ८.६० टक्केव सर्वसाधारण प्रवर्गासाठी ७४.८०) नमूद केल्यानुसार सन २०२३-२४ मध्ये राष्ट्रीय खादय तेल अभियान करिता एकूण रु.८६६९.५६ लाखाचा (केंद्र हिस्सा रु.५२०१.७४ व राज्य हिस्सा रु.३४६७.८२ लाख) प्रवर्गनिहाय वार्षिक कृती आराखडा खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | प्रवर्ग | मागणी क्र. | केंद्र / राज्य | लेखाशीर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद | कृती आराखडा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सर्वसाधारण | डी-०३ | केंद्र हिस्सा | २४०१ २४९८ | ३०००.०० | ३९६६.७६ |
| | | | राज्य हिस्सा | २४०१ १५३५ | २०००.०० | २६४४.५० |
| | | | **एकूण** | ---- | **५०००.००** | **६६११.२६** |
| २ | अनुसूचित जाती | एन-०३ | केंद्र हिस्सा | २४०१B४२८ | ६००.०० | ८११.४० |
| | | | राज्य हिस्सा | २४०१B४३७ | ३५०.०० | ५४०.९३ |
| | | | **एकूण** | --- | **९५०.००** | **१३५२.३३** |
| ३ | अनुसूचित जमाती | टी-०५ | केंद्र हिस्सा | २४०१A४८६ | ३१०.०० | ४२३.५९ |
| | | | राज्य हिस्सा | २४०१A४७७ | २०४.०० | २८२.३९३३ |
| | | | **एकूण** | ------ | **५१४.००** | **७०५.९८३३** |
| | एकूण एकंदर | | केंद्र हिस्सा | ---- | ३९१०.०० | ५२०१.७४ |
| | | | राज्य हिस्सा | ---- | २५५४.०० | ३४६७.८२ |
| | | | **एकूण** | ---- | **६४६४.००** | **८६६९.५६** |

३. सदर वार्षिक कृती आराखडयामधील पिकनिहाय तसेच घटक / उपघटक निहाय मंजूर आर्थिक व भौतिक लक्षांकाचे विवरण सोबतच्या **परिशिष्ट-१ ते ३** मध्ये नमूद केले आहे. सदर अभियानाची केंद्र व राज्याच्या ६०:४० आर्थिक सहभागाच्या प्रमाणात अंमलबजावणी करण्यात यावी.

४. सदर अभियानाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचा निधी प्रवर्गनिहाय ६०:४० प्रमाणात वेळोवेळी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर निधी केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ करिता करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा -

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण** | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीकसंवर्धन<br>११४, तेलबिया<br>(००)(०६)कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान<br>लघुअभियान-१ (तेलबिया)<br>(कें.पु.यो)(केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१२४९८), ३३-अर्थसहाय्य | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीकसंवर्धन<br>११४, तेलबिया<br>(००)(०१)कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान<br>लघुअभियान-१ (तेलबिया) (जिल्हा परिषद)<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१५३५), ३३-अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जाती** | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(०१) (२८) कृषि उन्नती योजना-<br>राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-गळीतधान्य आणि तेलताड (केंद्र हिस्सा६०%)<br>(२४०१B४२८), ३३- अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(०१) (२८) कृषि उन्नती योजना-<br>राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-गळीतधान्य आणि तेलताड (राज्य हिस्सा४०%)<br>(२४०१B४३७), ३३-अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जमाती** | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (१४) कृषि उन्नती योजना-<br>राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान<br>लघुअभियान-१ (तेलबिया)<br>(कें.पु.यो)(केंद्र हिस्सा६०%) (आक्षेउयो)<br>(२४०१A४८६), ३३- अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (१४) कृषि उन्नती योजना-<br>राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान<br>लघुअभियान-१ (तेलबिया)<br>(कें.पु.यो)(राज्य हिस्सा४०%)<br>(२४०१A४७७), ३३- अर्थसहाय्य |

४. केंद्र शासनाने संदर्भाकिंत दि.२३ मार्च, २०२१ च्या ज्ञापनाद्वारे PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार व संदर्भाकिंत दि.०२ ऑगस्ट, २०२१ च्या शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनासाठी राष्ट्रीय खादयतेल अभियान (NMEO) अंतर्गत गळीतधान्य योजना SNA मार्क करण्यात आली आहे.

५. केंद्र शासनाने सदर अभियानातंर्गत विहित केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच महिला शेतकरी लाभार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात यावा.

६. केंद्रीय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय खादय तेल अभियान अंतर्गत राज्य शासनास सन २०२३-२४ करिता संदर्भाकिंत दि.०९ मार्च, २०२३ व दि.१४ एप्रिल, २०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरिता मंजूर केलेल्या कृती आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे सनियंत्रण करावे, त्याप्रमाणे अभियानाची प्रभावी अंमलबजावणी व सनियंत्रणाकरिता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निर्देशित करावे.

७. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाच्या विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना वा सदर शेतकऱ्यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे. तसेच, शेतकऱ्यांचे अर्ज मागवून पारदर्शक पद्धतीने लाभार्थ्यांची निवड करावी.

८. या अभियानातर्गत विविध निविष्ठांच्या खरेदीसाठी (खते, औषधे, बियाणे, सिंचन साधने, यंत्र/औजारे इ.) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभार्थ्यांच्या बँक खाती अनुदान जमा करण्यात (Direct Benefit Transfer) यावे. सदर निविष्ठांची खुल्या बाजारातून खरेदी करण्याचे स्वातंत्र लाभार्थ्याला राहील. तथापि, या अभियानातर्गत शासकीय संस्थांनी/ शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांनी उत्पादित केलेल्या निविष्ठाचा पुरवठा करण्यात येत असल्यास संदर्भाकीत शासन निर्णय दि.१९/०४/२०१७ नुसार कार्यवाही करावी.

९. कृषि विभागाच्या योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्याबाबत संदर्भाधीन शासन परिपत्रक दि.०४/११/२०२० नुसार कृषि यांत्रिकीकरण, सिंचन साधने व सुविधा, प्रमाणित बियाणे वितरण व पिक प्रात्यक्षिके याबाबींची अंमलबजावणी करावी.

१०. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांनी/तालुका कृषि अधिका-यांनी अभियानाकरीता लाभार्थींची निवड करून अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतक-यांचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह मोबाईल/दूरध्वनी क्रमांक बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. बाबतची माहितीचा अंतर्भाव असावा. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांची राहील.

११. सदर लाभार्थांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतक-यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहाय्यकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिका-यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहाय्यकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२७१५२९४३१८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2023.06.27 15:39:37 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१४) महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१९) वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती.

# परिशिष्ट-१

## सन २०२३-२४ : राष्ट्रीय खाद्य तेल अभियान अंतर्गत (तेलबिया)

(आर्थिक रु.लाख)

| अ.क्र. | घटक/बाब | परिमाण | अर्थसहाय्याचा दर प्रति परिमाण | राज्य शासनास प्रस्तावित कार्यक्रम | | | | % |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक | | | |
| | | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | |
| **१)** | **बियाणे घटक** | | | | | | | ३० |
| अ | मूलभूत बियाणे खरेदी | क्विं. | बियाणे पूर्ण किंमत प्रतिपूर्ती स्वरूपात | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | |
| ब | पायाभूत बियाणे उत्पादन | क्विं. | रु.२५००/ | १६००० | २४०.०० | १६०.०० | ४००.०० | |
| क | प्रमाणित बियाणे उत्पादन | क्विं. | रु. २५००/ | ५५५०० | ८३२.५० | ५५५.०० | १३८७.५० | |
| ड | प्रमाणित बियाणे वितरण | | | | | | | |
| | ii) उच्च उत्पादकता वाण | क्विं. | रु. ४०००/- | १४७५० | ३५४.०० | २३६.०० | ५९०.०० | |
| | ii) संकरित / तीळ | क्विं. | रु.८०००/- | ३१ | १.५० | १.०० | २.५० | |
| | **एकूण.....१ (बियाणे घटक)** | --- | ----- | ----- | **१४२८.००** | **९५१.९९८** | **२३८०.००** | |
| **२** | **तंत्रज्ञान प्रसारण घटक** | | | | | | | |
| अ) | पिक प्रात्यक्षिके | | | | | | | ४७ |
| | i.भुईमुग | हे. | रु. १००००/- | ५०० | ३०.०० | २०.०० | ५०.०० | |
| | ii. सोयाबीन | हे. | रु. ६०००/- | ५४७५० | १९७१.०० | १३१४.०० | ३२८५.०० | |
| | iii.तीळ | हे. | रु. ३०००/ | २०० | ३.६० | २.४० | ६.०० | |
| | iv.करडई | हे. | रु. ३०००/ | ११००० | १९८.०० | १३२.०० | ३३०.०० | |
| | **एकूण पिक प्रात्यक्षिके (अ)** | | ---- | | **२२०२.६०** | **१४६८.४००** | **३६७१.००** | |
| ब) | शेतकरी शेतीशाळा (FFS) | संख्या | रु.१४०००/- | २०० | १६.८० | ११.२० | २८.०० | |
| क) | शेतकरी प्रशिक्षण | संख्या | रु.२४०००/- | १०० | १४.४० | ९.६० | २४.०० | |
| ड) | विस्तार अधिकारी प्रशिक्षण | संख्या | रु.३६०००/- | १९ | ४.१० | २.७४ | ६.८४ | |
| | **एकूण.......२ (तंत्रज्ञान प्रसारक घटक)** | --- | ----- | ---- | **२२३७.९०** | **१४९१.९३६** | **३७२९.८४** | |
| **३** | **उत्पादन वाढीसाठी निविष्ठा** | | | | | | | |
| अ) | जिप्सम/पायराईट्स/डोलोमाईट/सल्फर | हे. | रु.७५०/- | २०००० | ९०.०० | ६०.०० | १५०.०० | १० |
| ब) | जैविक खते | हे. | रु. ३००/- | २०००० | ३६.०० | २४.०० | ६०.०० | |
| क) | पिक संरक्षण औषधे | हे. | रु.५००/- | २०००० | ६०.०० | ४०.०० | १००.०० | |
| ड) | जैविक कीड नियंत्रण (एन.पी.व्ही.)चा पुरवठा | हे. | रु.५००/- | २०००० | ६०.०० | ४०.०० | १००.०० | |
| इ) | **सुधारित कृषी औजारे** | | | | | | | |
| | पाईप्सचा पुरवठा | मीटर | प्रकारानुसार रु.५०/- ते रु. २०/- | ७६८००० | २३०.४० | १५३.६० | ३८४.०० | |
| | **एकूण.......३ (उत्पादन वाढीसाठी निविष्ठा)** | --- | ---- | ----- | **४७६.४०** | **३१७.६००** | **७९४.००** | |
| **४** | **फ्लेक्झी निधी (गरजेनुरुप उपक्रम)** | | | | | | | |
| अ) | छोटे तेल घाणा सयंत्र | संख्या | यांत्रिकीकरण उपअभियानाप्रमाणे | ५७ | ६१.५६ | ४१.०४ | १०२.६० | १० |
| ब) | डीझेल/ विद्युतचलित पंपसंच | संख्या | रु. १०,०००/- | ३०९७ | १८५.८२ | १२३.८८ | ३०९.७० | |
| क) | मनुष्यचलित टोकनयंत्र | संख्या | रु. ०.१० लाख /यंत्र | ९५० | ५७ | ३८ | ९५ | |
| ड) | मनुष्यचलित सायकल वर चालणारे सीड ड्रील | संख्या | रु.५००० /ड्रील | ९५० | २८.५० | १९.०० | ४७.५० | |
| इ) | गोदाम उभारणी (साठवणूक सुविधा) | संख्या | रु.१२.५० लाख / २५० मे.टन क्षमता | १९ | १४२.५० | ९५.०० | २३७.५० | |
| | **एकूण.......४ (फ्लेक्झी निधी)** | | ---- | --- | **४७५.३८** | **३१६.९२०** | **७९२.३०** | |
| **५** | **अभियान व्यवस्थापन खर्च** | | | | | | | |
| अ) | तांत्रिक सहाय्यता गटाचे मानधन | | | | | | | ३ |
| | i) राज्यस्तरीय तंत्र सहाय्यता गट मानधन | संख्या | रा.अ.सु.अ.कडधान्य प्रमाणे | ४ | १२.२४ | ८.१६ | २०.४० | |
| | ii) जिल्हास्तरीय तंत्र सहाय्यता गट मानधन | संख्या | | ३८ | ९५.७६ | ६३.८४ | १५९.६० | |
| | iii) जी.एस.टी.+ सुविधा शुल्क + इतर शुल्क | संख्या | ... | ... | २०.२७ | १३.५१ | ३३.७९ | |
| क) | संकीर्ण खर्च | संख्या | रु.१.६० लाख/जिल्हा | २० | १५.१७ | १०.११ | २५.२८ | |
| | **एकूण ......५ (अभियान व्यवस्थापन खर्च)** | ---- | ----- | ---- | **१४३.४४** | **९५.६२८** | **२३९.०७** | |
| | **एकूण एकंदर (अ)** | | ---- | ---- | **४७६१.१२** | **३१७४.०८** | **७९३५.२१** | १००.०० |
| | **ब) प्रलंबित दायित्व २०२१-२२ व २०२२-२३** | | ---- | ---- | ---- | ---- | ---- | ---- |
| i | **प्रलंबित दायित्व** | ---- | ---- | ---- | ३०१.३८ | २००.९२ | ५०२.२९ | ---- |
| | **एकूण एकंदर (अ+ब)** | | ---- | ---- | **५०६२.५०** | **३३७५.००** | **८४३७.५०** | ---- |

# परिशिष्ट-२

## सन २०२३-२४ : राष्ट्रीय खाद्य तेल अभियान अंतर्गत (वृक्षजन्य तेलबिया)

(आर्थिक रु.लाख)

| अ.क्र. | घटक/बाब | परिमाण | अर्थसहाय्याचा दर प्रति परिमाण | राज्य शासनास प्रस्तावित कार्यक्रम | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक | | |
| | | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १ | **क्षेत्र विस्तार घटक** | | | | | | |
| अ) | वृक्ष निहाय लागवड | | | | | | |
| | i) करंज | हेक्टर | रु. २०,०००/- | ५० | ६.०० | ४.०० | १०.०० |
| | ii) कोकम | | रु. १५,०००/- | १५० | १३.५० | ९.०० | २२.५० |
| | iii) महुआ | | रु. १५,०००/- | ५० | ४.५० | ३.०० | ७.५० |
| **एकूण......१(अ)** | | | **----** | **२५०** | **२४.००** | **१६.००** | **४०.००** |
| **ब)** | वृक्षजन्य तेलबिया लागवडी पश्यात देखभाल | | | | | | |
| | i) करंज | हेक्टर | रु. २०००/- | १० | ०.१२ | ०.०८ | ०.२० |
| | ii) कोकम | | रु. २०००/- | १२५ | १.५० | १.०० | २.५० |
| | iii) महुआ | | रु. २०००/- | १५ | ०.१८ | ०.१२ | ०.३० |
| | **एकुण.......१ (ब)** | | **-----** | **१५०** | **१.८०** | **१.२०** | **३.००** |
| **एकुण.........(१)** | | | **----** | **४००** | **२५.८०** | **१७.२०** | **४३.००** |
| २ | **तंत्रज्ञान प्रसार घटक** | | | | | | |
| अ) | शेतकरी प्रशिक्षण | संख्या | रु. २४०००/- | ५ | ०.७२ | ०.४८ | १.२० |
| ब) | विस्तार कर्मचारी/ अधिकारी/निविष्ठा विक्रेते प्रशिक्षण | | रु. ३६०००/- | १ | ०.२२ | ०.१४ | ०.३६ |
| **एकूण......(२)** | | | **----** | **६** | **०.९४** | **०.६२** | **१.५६** |
| ३ | **अभियान व्यवस्थापन खर्च: संकीर्ण** | ---- | ----- | ---- | ०.६० | ०.४० | १.०० |
| ४ | **फ्लेक्झी निधी** | | | | | | |
| अ) | डिझेल/विद्युत पंपसंच | | रु. १०,०००/- | ४५ | २.७० | १.८० | ४.५० |
| **एकूण......(४)** | | | ----- | **----** | **२.७०** | **१.८०** | **४.५०** |
| **३+४** | | | | | **३.३०** | **२.२०** | **५.५०** |
| **एकूण....अ (नियमित कार्यक्रम)** | | ---- | ----- | **----** | **३०.०४** | **२०.०२** | **५०.०६** |
| **ब) प्रलंबित दायित्व २०२१-२२ व २०२२-२३** | | | ----- | **----** | **९.२१** | **६.१४** | **१५.३५** |
| **एकूण एकंदर (अ+ब)** | | | ----- | **----** | **३९.२४** | **२६.१६** | **६५.४१** |

## परिशिष्ट-३

## सन २०२३-२४ : राष्ट्रीय खाद्य तेल अभियान अंतर्गत भात पड क्षेत्रामध्ये तेलबिया उत्पादन वाढ (TRFA)

(आर्थिक रु.लाख)

| अ.क्र. | घटक/बाब | परिमाण | अर्थसहाय्याचा दर प्रति परिमाण | राज्य शासनास प्रस्तावित कार्यक्रम | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक | | |
| | | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| **१)** | **समुह गटप्रात्यक्षिके** | | | | | | |
| अ) | मोहरी | हे. | रु.३०००/हे. | ५० | ०.९० | ०.६० | १.५० |
| ब) | जवस | | रु.३०००/हे. | १०० | १.८० | १.२० | ३.०० |
| क) | करडई | | रु.३०००/हे. | १३०० | २३.४० | १५.६० | ३९.०० |
| ड ) | भुईमुग | | रु.१००००/हे. | १००० | ६०.०० | ४०.०० | १००.०० |
| **एकूण ....१** | | | --- | **२४५०** | **८६.१०** | **५७.४०** | **१४३.५०** |
| **२)** | **प्रमाणित बियाणे वितरण HYV** | क्वि. | रु.४०००/क्वि. | ५० | १.२० | ०.८० | २.०० |
| **३)** | **एकात्मिक अन्नद्रव्य व्यवस्थापन** | | | | | | |
| अ) | सूक्ष्म मूलद्रव्ये | हे. | रु.५००/हे. | १५० | ०.४५ | ०.३० | ०.७५ |
| ब) | जैविक कीटकनाशके (Bio-Pesticide) | | रु.५००/हे. | १५० | ०.४५ | ०.३० | ०.७५ |
| **एकूण ....३** | | | ---- | ---- | **०.९०** | **०.६०** | **१.५०** |
| **४)** | **सिंचन साधने : पाईप्सचा पुरवठा** | मीटर | PMKSY प्रमाणे | ७००० | २.१० | १.४० | ३.५० |
| **५)** | **प्रशिक्षण** | | | | | | |
| अ) | शेतकरी प्रशिक्षण | संख्या | रु. ०.२४ लाख/प्र. | २५ | ३.६० | २.४० | ६.०० |
| ब) | अधिकारी प्रशिक्षण | | रु. ०.३६ लाख/प्र. | २ | ०.४३ | ०.२९ | ०.७२ |
| **एकूण ....५** | | | **----** | **----** | **४.०३** | **२.६९** | **६.७२** |
| **६)** | **संकीर्ण खर्च** | ----- | ---- | ---- | २.४४ | १.६२ | ४.०६ |
| **एकूण ....अ (१ ते ६)** | | ---- | ---- | ---- | **९६.७७** | **६४.५१** | **१६१.२८** |
| ब) | प्रलंबित दायीत्व सन २०२२-२३ | ---- | ---- | ---- | ३.२३ | २.१५ | ५.३८ |
| **एकूण एकंदर (अ+ब)** | | **----** | **----** | **----** | **१००.००** | **६६.६६** | **१६६.६६** |